“आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण” या योजनेतील ४१४ योजनांतर्गत अस्थायी पदे दि. ०१.०६.२०१८ पासून दि. ३०.०९.२०१८ पर्यंत चालू ठेवण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१८/प्र.क्र. ७८/व्यशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१८.

पहा: १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/ वित्तीय सुधारणा-१, दि. ४/१०/२००४.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. औप्रसं १२०४/ प्र.क्र. २३/का.१२, दि. २३/०८/२००४
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि. ०५.०३.२०१८
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१८/ प्र.क्र. ७८/व्यशि-३, दि. ०६.०४.२०१८
५) संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र. ४/आस्था-३/मुदतवाढ/२०१८/ (१६/२९)/७७०, दि. २०.०५.२०१८.

**प्रस्तावना** :- व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील “आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण” या योजनेतील ४१४ योजनांतर्गत अस्थायी पदांना संदर्भीय (२) येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार वरील संदर्भ क्र. (४) अन्वये सदर ४१४ अस्थायी पदांना दिनांक ३१.०५.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन (३) येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३०.०९.२०१८ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्यास अनुलक्षून संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भीय (५) येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार दिनांक ०१.०६.२०१८ ते ३०.०९.२०१८ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय**</u> :- व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील “आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण” या योजनेतील सोबतच्या प्रपत्र अ मधील योजनांतर्गत ४१४ अस्थायी पदांना दिनांक ०१.०६.२०१८ पासून दिनांक ३०.०९.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटी व शर्तीस अधिन राहून मंजूरी देण्यांत येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करण्यांत आली, त्याच प्रयोजनासाठी पुढे चालू ठेवण्यात यावीत. चालू ठेवण्यात आलेल्या अस्थायी पदांवरील कर्मचारी नियमानुसार मिळणारे वेतन भत्ते इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावेत.

२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही याची खात्री करून घेण्यात यावी.

३) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेतलेली आहे. तथापि, त्यानंतर पदनिर्मिती मंजूर झालेली आहे. अशा प्रकरणी नवनिर्मिती पदांच्या समवेक्षनासह पदांच्या आकृतीबंधास मान्यता घेण्याची कार्यवाही विहित कालावधीत पूर्ण करावी.

४) पदांचा आढावा घेवून, सुधारित आकृतीबंधास दिनांक ३०.०९.२०१८ पर्यंत कोणत्याही परिस्थितीत उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या कालावधीत उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यात आली नाही, तर या पुढे सदर पदांना मुदतवाढ देण्यास आदिवासी विकास विभागामार्फत सहमती दर्शविण्यात येणार नाही.

५) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील. या कालावधीनंतर आकृतीबंध निश्चित करण्यासाठी कालावधी वाढवून देण्यात येणार नसल्याची कृपया नोंद घ्यावी.

२. या प्रस्तावावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

***“मागणी क्र. टी-५, लेखाशीर्ष २२३० कामगार व सेवायोजन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, जनजाती क्षेत्र उपयोजना, ०३-प्रशिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१)(०१) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, आदिवासी भागातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार (२२३० ०७६४)”***

**उपरोक्त लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय अंदाज, सुधारित अंदाज तसेच अंतिम सुधारित अनुदानाचे प्रस्ताव विहित वेळेत सादर करण्याची दक्षता संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.**

३. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५/का.९, दिनांक २८ मार्च, २०१८ तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दिनांक ०५ मार्च, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०२१३०६०७०७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2018.07.02 15:50:23 +05'30'

**(संतोष वि. रोकडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालनालयामार्फत).
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-२)/(व्यशि-५/रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.कार्यासन अधिकारी (का.०९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्र.आयटीआय-२०१८/प्र.क्र.७८/व्यशि-३,
दि. ३० जून, २०१८ सोबतचे सहपत्र

**प्रपत्र "अ"**

आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण" या योजनेतील ४१४ योजनांतर्गत अस्थायी पदे दि. ०१.०६.२०१८ ते ३०.०९.२०१८ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याबाबत

| अ. क्र. | पदनाम | ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | | मुदतवाढ देण्यात आलेली योजनांतर्गत अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| | | वेतन बँड | ग्रेड वेतन | |
| १ | प्रकल्प अधिकारी | ९३००-३४८०० | ४८०० | २८ |
| २ | गट निदेशक | ९३००-३४८०० | ४८०० | २ |
| ३ | शिल्प निदेशक | ९३००-३४८०० | ४३०० | २७५ |
| ४ | शिल्प निदेशक (डेंटल लॅब टेक्निशियन) | ९३००-३४८०० | ४३०० | ६ |
| ५ | सहायक अधिव्याख्याता | ९३००-३४८०० | ४३०० | ३९ |
| ६ | गणित चित्रकला निदेशक | ९३००-३४८०० | ४३०० | २८ |
| ७ | वसतिगृह अधिक्षक तथा लिपिक | ५२००-२०२०० | २८०० | २ |
| ८ | वरिष्ठ लिपिक तथा भांडारपाल | ५२००-२०२०० | २४०० | २८ |
| ९ | वसतिगृह पहारेकरी | ४४४०-७४४० | १३०० | ६ |
| | **एकूण** | | | **४१४** |

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2018.07.02 15:50:37 +05'30'

(संतोष वि. रोकडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन